राज्य शासनाच्या मोफत गणवेश,
बुट व पायमोजे योजनेंतर्गत निधी
वितरणाबाबत... (सन २०२४-२५)

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसएसए-२०२३/प्र.क्र.१७६/एस.डी.३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: ११ मार्च, २०२५

**वाचा:-**

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.एसएसए-१२१४/प्र.क्र.५०/एस.डी.३, दि.०६/०७/२०२३.

२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.एसएसए-१२२०/प्र.क्र.१५४/एस.डी.३, दि.१८/१०/२०२३.

३) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं -२०२४/प्र.क्र.३४/अर्थ -३, दि.०१ एप्रिल, २०२४.

४) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.एसएसए-२०२३/प्र.क्र.१७६/एस.डी.३, दि.१७/०५/२०२४.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या समग्र शिक्षा कार्यक्रमांतर्गत शासकीय तसेच स्थानिक स्वराज्य संस्थांच्या शाळांमधील इ.१ ली ते इ.८ वी मधील शिक्षण घेत असलेल्या सर्व मुली, अनुसूचित जाती व जमाती प्रवर्गातील मुले तसेच दारिद्र्यरेषेखालील पालकांची मुले यांना मोफत गणवेश योजनेचा लाभ देण्यात येतो. तसेच, सन २०२३-२४ या शैक्षणिक वर्षापासून प्रस्तुत योजनेचा लाभ दारिद्र्यरेषेवरील पालकांच्या मुलांनादेखील देण्याबाबतचा निर्णय दि.०६ जुलै, २०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. केंद्र शासनाच्या समग्र शिक्षा कार्यक्रमांतर्गत मोफत गणवेश योजनेकरीता निर्धारित केलेल्या प्रति गणवेश रु.३००/- याप्रमाणे राज्य शासनाने सुध्दा दोन गणवेशाकरीता रु.६००/- प्रति विद्यार्थी रक्कम निश्चित केली आहे.

मोफत गणवेश योजनेप्रमाणेच शासकीय तसेच स्थानिक स्वराज्य संस्थांच्या शाळांमधील इ.१ ली ते इ.८ वी मधील सर्व विद्यार्थ्यांना सन २०२३-२४ पासून दरवर्षी एक जोडी बुट व दोन जोडी पायमोजे यांचा लाभ शाळा व्यवस्थापन समितीमार्फत देण्यात येत आहे. याकरीता प्रति विद्यार्थी रु.१७०/- इतकी रक्कम निश्चित करण्यात आली आहे.

राज्य शासनाच्या मोफत गणवेश बुट व पायमोजे योजनेंतर्गत शासन निर्णय दि.१७ मे, २०२४ अन्वये रु.८५०० लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. तसेच, सदर योजनेच्या अंमलबजावणीकरीता एकूण रु.१४४,४८,०१,०८०/- इतका निधी आवश्यक असल्याचे महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषदेमार्फत कळविण्यात आले आहे. त्यानुषंगाने सदर योजनेंतर्गत रु.५९,४८,०१,०८०/- इतका उर्वरित निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषदेमार्फत करण्यात आली आहे. सदरप्रमाणे निधी वितरणास मान्यता देण्याचा प्रस्ताव नियोजन विभागामार्फत वित्त विभागास सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास नियोजन व वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन रु.५९,४८,०१,०८०/- इतका निधी महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषदेस उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णयः-</u>**

राज्य शासनाच्या मोफत गणवेश, बुट व पायमोजे योजनेंतर्गत खालीलप्रमाणे रु.५९,४८,०१,०८०/- (रुपये एकोणसाठ कोटी अठ्ठेचाळीस लाख एक हजार ऐंशी फक्त) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **लेखाशिर्ष** | **सन २०२४-२५ मधील सुधारित अर्थसंकल्पिय तरतूद** | **या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत असलेला निधी** |
|---|---|---|---|
| १. | मागणी क्रमांक ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ - प्राथमिक शिक्षण, १०३ - प्राथमिक शिक्षणासाठी स्थानिक संस्थांच्या सहाय्य, (१) प्राथमिक शिक्षणासाठी स्थानिक संस्थांच्या सहाय्य, (०१) (२०) मोफत गणवेश, बुट व पायमोजे योजना (राज्यस्तरीय योजना) (२२०२ के ८३८) ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) | रु.१४४५० लक्ष | रु. ५९,४८,०१,०८०/- |
| | **एकूण** | **रु.१४४५० लक्ष** | **रु. ५९,४८,०१,०८०/-** |

२. सदर शासन निर्णय नियोजन विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.५०७/१४७१, दि.३१ डिसेंबर, २०२४ तसेच, वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.८६/व्यय-५, दि.२८ जानेवारी, २०२५ अन्वये दिलेल्या निर्देशास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर योजनेच्या अंमलबजावणीकरीता वितरीत करण्यात येणारे अनुदान सशर्त अनुदान असून त्याकरीता शासन निर्णय दि.०६ जुलै, २०२३ मधील तरतूदी लागू राहतील.

४. सदर निधी राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नी रोड, मुंबई यांचेकडे सुपूर्द करण्यात येत आहे. सदर निधी आहरीत करुन वितरीत करण्यासाठी अवर सचिव / कक्ष अधिकारी (रोख शाखा/लेखा शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना "आहरण व संवितरण अधिकारी" तर सह सचिव / उप सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर निधी केंद्र व राज्य शासनने वेळोवळी दिलेले निर्देश/आदेश/शासन निर्णय/परिपत्रक/सूचना यांना अनुसरुन विहित कालावधीत खर्च करण्याची दक्षता राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नी रोड, मुंबई यांनी घेण्यात यावी. तसेच, सदर निधी खर्च केल्यानंतर याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

६. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३१११४४६५३३४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAMOD ABAJI PATIL

Digitally signed by PRAMOD ABAJI PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPARTMENT,
2.5.4.20=4a3b99d57d257e955ed34ca51db1f3c521002555e05c455e86fa1c9c82a1d82b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=68D5A8ABFFDD75CBA24301AA39C12B40983F304D7267796A32B42D4D558F1A1F, cn=PRAMOD ABAJI PATIL
Date: 2025.03.11 14:48:30 +05'30'

**(प्रमोद पाटील)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री, शालेय शिक्षण, यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
४) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

५) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
६) सर्व मा. संसद सदस्य/ विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य
७) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
९) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नी रोड, मुंबई
११) सह सचिव / उप सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१३) शिक्षण संचालक (माध्य. व उच्च माध्य.), महाराष्ट्र राज्य, पुणे
१४) शिक्षण संचालक (योजना), महाराष्ट्र राज्य, पुणे
१५) शिक्षण संचालक (प्राथ.), महाराष्ट्र राज्य, पुणे
१६) शिक्षणाधिकारी (प्राथ.), जिल्हा परिषद (सर्व)
१७) अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८) अवर सचिव / कक्ष अधिकारी (रोख शाखा/लेखा शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½ , मुंबई/नागपूर
२०) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
२१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई
२२) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई
२३) नियोजन विभाग, कार्यासन १४७१, मंत्रालय, मुंबई
२४) निवड नस्ती - एस.डी. ३